केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान योजनेकरिता अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतूदीमधून निधी वितरीत करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२१०जी६१८)
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२१०जी६२७)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२२/प्र.क्र. १४/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक - ०४ मार्च, २०२२

<u>वाचा :</u>- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२८.१.२०२२ व दि. ३.२.२०२२
२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.बीयुडी-१३२१/प्र.क्र.२१/आरोग्य-७

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान योजनेसाठी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२१०-सार्वजनिक आरोग्य, ७८९-अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०७) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी६१८, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.१८००.०० लाख एवढी मूळ तरतूद असून त्यापैकी रु. ८७६.०० लाख इतका निधी वितरीत झाला आहे व रु. ९२४.०० लाख इतका निधी शिल्लक आहे. व केंद्र हिस्सा लेखाशीर्ष २२१८ जी ६१८ साठी पुरवणी मागणीव्दारे रु. ८७७.३८ लाख एवढा निधी मंजूर आहे. तर (०१) (०८) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी६२७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.१२००.०० लाख इतका मूळ तरतूद असून त्यापैकी रु. ११७०.८१ लाख इतका निधी वितरीत झाला असून रु. २९.१९ लाख इतका निधी शिल्लक आहे.. लेखाशिर्ष २२१०जी६२७(राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) साठी हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीव्दारे रु. ११७१.७३ लाख एवढा निधी मंजूर आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.३.२.२०२२ रोजीच्या शासन परीपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान योजनेसाठी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीत तरतूदीतून, (०१) (०७) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी६१८, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या अंतर्गत शिल्लक मूळ तरतूदीमधून रु३१०.०० लाख तसेच (०१) (०८) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी६२७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षामधून शिल्लक मूळ तरतूदीमधून रु. २९.१९ लाख व पुरवणी मागणीव्दारे मंजूर निधीमधून रु. १७७.४८ लाख मिळून एकूण रु. २०६.६७ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. कोव्हीड-१९ मुळे राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

४. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.३.२.२०२२ च्या शासन परीपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.३.२.२०२२ रोजीच्या शासन परीपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ५८/ दि.२४.०२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०७१२३९२८८२२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.03.07 12:42:12 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व जिल्हाधिकारी
४) महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सार्व जनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.